# महाराष्ट्र विकास सेवा गट- अ मधील अधिका-यांची दिनांक - १.१.२००५ ते दिनांक- ३१.१२.२०१० पर्यंतची अंतरिम जेष्ठतासूची



ग्राम विकास व जलसंधारण विभाग

महाराष्ट्र शासन

# अनुक्रमणिका

**महाराष्ट्र विकास सेवा गट-अ मधील अधिकाऱ्यांची दिनांक १.१.२००५ ते ३१.१२.२०१० पर्यंतची अंतरिम ज्येष्ठतासूची ( वर्षनिहाय )**

महाराष्ट्र शासन
ग्राम विकास व जलसंधरण विभाग,
परिपत्रक क्रमांक :मविसे १०/२०१०/प्र.क्र.३२१/आस्था-३
मंत्रालय,मुंबई-४०० ०३२
दिनांक:- ३० ऑक्टोबर,२०१०

संदर्भ:-
१) शासन परिपत्रक ,ग्राम विकास व जलसंधारण विभाग, क्रमांक: मविसे १०/२००५/ प्र.क्र. २६१ (भाग-२) /आस्था-३, दिनांक २१ नोव्हेंबर, २००५
२) विभागीय आयुक्त, कोकण विभाग,नवी मुंबई यांचे पत्र क्र.विकास /मविसे /कार्या-१ /पदोन्नती / २०१० , दिनांक २३.४.२०१०
३) विभागीय आयुक्त, पुणे विभाग यांचे पत्र क्र.मविसे /आस्था/१/कावि / १५९ /२०१०, दिनांक ३.५.२०१०
४) ४) विभागीय आयुक्त, नाशिक विभाग, यांचे पत्र क्र. विकास / कार्या - १९ / आस्था-३ / ६३१० / १०दिनांक ६.३.२०१०
५) ५) विभागीय आयुक्त, अमरावती विभाग, यांचे पत्र क्र.विकास / मविसे / कावि - ५५५ / २०१०, दिनांक २२.३.२०१०
६) ६) विभागीय आयुक्त, औरंगाबाद विभाग, यांचे पत्र क्र.२०१० / विशा / कक्ष-१/मविसे -१/ प्र.क्र.१७८/०८ /कावी -६८०/२०१०,दिनांक- १०. ५. २०१०
७) ७) विभागीय आयुक्त, नागपूर विभाग,यांचे पत्र क्र. विशा / कार्या-१० (४) / प्र.क्र. १६ / ०८ /२०१० , दिनांक १३.५.२०१०

१. श्री.सुनिल मधुकर केंद्रेकर व इतर यांनी महाराष्ट्र विकास सेवा अधिकारी , गट-अ यांची महाराष्ट्र विकास सेवा वर्ग-१ मध्ये कोटा रुलचे पालन न केल्याबद्दल व शासनाने निश्चित केलेला कोटा रुल अंमलात आणलेला नसल्याने, कोटा रुलची अंमलबजावणी करुन, त्यानुसार सेवाज्येष्ठता निश्चित करण्यासंदर्भात महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण , मुंबई खंडपीठ औरंगाबाद येथे मूळ अर्ज क्रमांक २५६/२००० व मूळ अर्ज क्रमांक २५४/२००० दाखल केला होता. सदरील दोन्ही अर्जावर मा.प्रशासकीय न्यायाधिकरणाने सरळ सेवा भरती करतांना शासनाने निश्चित केलेल्या कायम स्वरुपाच्या पदाव्यतिरिक्त कायम स्वरुपी पदाचे गुणधर्म असलेल्या इतर पदांची काटेकोरपणे नोंद घेऊन, त्यांचाही समावेश कायम पदात करुन, त्यानुसार सरळसेवा भरतीचा कोटा निश्चित करुन,

वर्षनिहाय ज्येष्ठता सूची करण्यात यावी आणि सरळसेवा भरतीने नियुक्त अधिकारी व पदोन्नतीने नियुक्त झालेल्या अधिका-यांना त्यांच्या उपलब्ध कोटयात स्थान देण्यात यावे व आतापर्यंत सध्याची जी सूची आहे ती कामचलाऊ सूची आहे व या कामचलाऊ सूचीपासून मिळणारे फायदे हे अभावित समजण्यात येतील असा निर्णय दिनांक २२.११.२००२ रोजी दिला. मा.न्यायाधिकरणाने मुळ अर्ज क्रमांक-२५६/२००० संदर्भात दि.२२.११.२००२ रोजी दिलेल्या निर्णयाविरुध्द सन्मा. उच्च न्यायालय मुंबई खंडपीठ औरंगाबाद येथे रिट याचिका क्र.२१७८/२००३ दाखल केली होती. तथापि, मा.उच्च न्यायालयाने मा. न्यायाधिकरणाच्या निर्णयास स्थगिती दिलेली नाही. सदर प्रकरण दाखल (Admit) करुन घेतले आहे. आणि मा.न्यायाधिकरणाच्या निर्णयानुसार केलेली जेष्ठतासुची ही सदरील रिट याचिकेच्या अंतीम निर्णयाच्या अधीन राहील असे स्पष्ट केले आहे.

सन्मा. न्यायाधिकरणाने दि.२२.११.२००२ रोजी दिलेल्या निर्णयाच्या अनुषंगाने शासनाने जेष्ठता यादी तयार केली नाही किंवा न्यायाधिकरणाच्या निर्णयाची अंमलबजावणी केली नाही म्हणून श्री.केंद्रेकर यानी सन्मा. न्यायाधिकरणात अवमान याचिका क्रमांक ८९/२००३ दाखल केली होती सदर अवमान याचिके प्रकरणी सन्मा. न्यायाधिकरणाने दिनांक-२८.४.२००४ रोजी दिलेल्या आदेशाविरुध्द श्री..अंकुश हरिश्चद्र बगाटे व इतर यानी महाराष्ट्र शासन व इतर याच्या विरुध्द मा. उच्च न्यायालय मुंबई खंडपीठ, औरंगाबाद येथे रिट याचिका क्रमांक-२४६६/२००५ दाखल केलेली आहे. मा.उच्च न्यायालयाने दि.८.४.२००५ रोजी रिट याचिका क्रमांक- २४६६/२००५ मध्ये दिलेल्या अंतरिम आदेशाद्वारे महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरणाच्या दिनांक-२८.४.२००४ च्या आदेशास स्थगिती दिलेली आहे. तथापि, मा.उच्च न्यायालयाने मुळ अर्ज क्रमांक- २५६/२००० संदर्भात मा.न्यायाधिकरणाने दिनांक- २२.११.२००० रोजी दिलेल्या अंमलबजावणी साठी शासनास कोणताही प्रतिबंध केलेला नाही. दरम्यान शासनाने दिनांक-२८.१०.२००४ च्या परिपत्रकान्वये महाराष्ट्र विकास सेवा गट-अ मधील अधिकाऱ्यांची दिनांक-१.१.१९८४ ते ३१.१२.१९९३ या कालावधीची अंतरीम जेष्ठतासुची प्रसिध्द केली आणि ती दिनांक-२२.३.२००५ च्या परिपत्रकाद्वारे अंतीम करण्यात आली. याप्रमाणे अंतिम केलेल्या सुचीस श्री.अंकुश हरिश्चंद्र बगाटे यानी मा.उच्च न्यायालय मुंबई, खंडपीठ औरंगाबाद येथे संकीर्ण अर्ज क्र.८२५६/२००५ रिट याचिका क्र.२४६६/२००५ मध्ये दाखल केला होता सदर संकीर्ण अर्जाची सुनावणी दि.२२.७.२००५ झाली असता मा.उच्च न्यायालयाने शासनाने दिनांक-२८.१०.२००४ च्या परिपत्रकाद्वारे प्रसिध्द केलेली अंतरिम जेष्ठतासुची जी की, दिनांक-

२२.३.२००५ च्या परिपत्रकाद्वारे , अंतीम केलेली आहे, सदरील जेष्ठतासुची मा.न्यायाधिकरणाच्या दिनांक-२२.११.२००२ च्या निर्णयाप्रमाणे काटेकोरप्रमाणे बनविण्यात आली किंवा सदरील जेष्ठतासूचीवर मा. न्यायाधिकरणाने दिनांक-२८.४.२००४ रोजी दिलेल्या निर्देशाचा कोणताही प्रभाव नाही किंवा मा. उच्च न्यायालयाच्या दिनांक-८.४.२००५ च्या अंतरिम आदेशाचे कोठेही उल्लंघन होत नाही, ही बाब मा.न्यायाधिकरणास पटवून दिल्याशिवाय अंमलात आणता येणार नाही. असे स्पष्ट केले. दरम्यान शासनाने दिनांक-३०.७.२००५ रोजी जेष्ठतासूची संदर्भात कार्यालयीन आदेश निर्गमित केले. मा.न्यायाधिकरणाने दिनांक-१.८.२००५ रोजी दिलेल्या आदेशाविरुध्द श्री.अंकुश हरिश्चंद्र बगाटे व इतर यानी मा. उच्च न्यायालय मुंबई, खंडपीठ औरंगाबाद या ठिकाणी रिट याचिका क्रमांक-५१३०/२००५ दाखल केली होती. सदरील रिट याचिकेवर दिनांक-५.८.२००५ रोजी झालेल्या सुनावणी संदर्भात मा. उच्च न्यायालयाने सहा आठवडयांच्या आंत नव्याने जेष्ठतासुची तयार करण्याचे आदेश दिले. याप्रमाणे मा. उच्च न्यायालयने रिट याचिका क्रमांक-५१३०/२००५ मध्ये दिलेल्या निर्देशानुसार तसेच श्री.केंद्रेकर व इतर यानी दाखल केलेल्या मुळ अर्ज क्रमांक-२५६/२००० वरील सन्मा. न्यायाधिकरणाने दिनांक-२२.११.२००२ च्या निर्णयाची अंमलबजावणी न झाल्याबद्दल श्री.केंद्रेकर यानी दाखल केलेल्या अवमान याचिका क्रमांक-८९/२००३ मध्ये दिलेल्या निर्देशानुसार मा.उच्च न्यायालयाने देखील मा.न्यायाधिकरणाने घालून दिलेल्या मुदतीत शासनाने कार्यवाही करावी असे निर्देश दिले. यासर्व बाबी लक्षात घेवून शासनाने वरील संदर्भ क्रमांक-१ मधील दिनांक-२२.११.२००५ च्या परिपत्रकान्वये मा.उच्च न्यायालय खंडपीठ, औरंगाबाद येथे दाखल करण्यात आलेल्या रिट याचिका क्रमांक- २१७८/२००३, २०५५/२००३, ३४६९/२००३, २४६६/२००५ व २९८०/२००५ वरील अंतीम निर्णयाच्या अधीन राहून अंतीम जेष्ठतासुची प्रसिध्द केलेली आहे. सदर जेष्ठतासुची प्रसिध्द करतांना सन्मा. न्यायाधिकरणाने दिनांक-२२.११.२००२ रोजी दिलेल्या निर्देशानुसार ज्याबाबी विचारात घेतल्या आहेत, त्या वरील संदर्भ क्रमांक १ मधील परिपत्रकाच्या परिच्छेद क्रमांक-८, ९, १०, ११, १२, १२.१, १३ मध्ये स्पष्ट केल्या आहेत. तसेच सर्वश्री पी.डी.कासार, एस.ए.ढमाले, बी.ए.शेख, यु.जी.करपे, डी.आर.बारी व यु.एम.खंबाळकर यांच्या जेष्ठतेसंदर्भात संदर्भ क्रमांक १ मधील परिपत्रकाच्या परिच्छेद क्रमांक-१५ मध्ये स्पष्टीकरण देण्यात आले आहे.

२. श्री.सोमवंशी व इतर अधिकारी हे महाराष्ट्र विकास सेवा गट-ब मध्ये नियुक्त झ् ााल्यानंतर ते विहीत कालावधीत विभागीय परिक्षा उत्तीर्ण झालेले नाहीत. म्हणून ते गट-अ पदावर

पदोन्नतीस पात्र ठरत नाही असा शासनाने निर्णय घेऊन त्यांचा गट-अ मधील पदोन्नतीसाठी विचार केला नाही. म्हणून या अधिकाऱ्यांनी महाराष्ट्र प्रशासकीय न्यायधिकण खंडपीठ औरंगाबाद येथे मुळ अर्ज स्टॅम्प क्रमांक- ४३६/२००७ दाखल केला होता. तो अर्ज सन्मा. न्यायधिकरणाने दिनांक- २३.७.२००७ च्या आदेशान्वये फेटाळून लावलेला आहे. तद्नंतर या अधिकाऱ्यांनी सदर निर्णयाविरुध्द सन्मा. उच्च न्यायालय खंडपीठ, औरंगाबाद येथे रिट याचिका क्रमांक- ४१९७/२००७ व ६४६१/२००७ दाखल केल्या होत्या या दोन्ही रिट याचिका न्यायालयाने दिनांक-३०.१.२००८ च्या आदेशान्वये निकाली काढून अर्जदारांची विनंती मान्य करता येत नाही असा निर्णय दिला आहे. त्याचबरोबर गट-अ मध्ये पदोन्नती देत असताना मा.न्यायधिकरणाने विभागीय परिक्षा नियमाबाबत न्याय निर्णयात दिलेले निर्देश विचारात घेऊन गट-अ मध्ये पदोन्नती देण्याची कार्यवाही करावी, तसेच शासनाने विभागीय परिक्षा नियमाचे पालन करण्याबाबत निर्गमित केलेले दिनांक-१४.३.२००७ चे परिपत्रक योग्य असल्याने ते रद्द करण्याची विनंती मान्य करता येत नाही. तथापि, अर्जदार श्री.सोमवंशी व इतर यांनी हया अगोदर काही अधिकाऱ्यांना परिक्षा उत्तीर्ण झाले नसतानाही गट-अ मध्ये पदोन्नती देण्यात आलेली आहे. तर काही अधिकारी गट-ब च्या पदावर कार्यरत आहेत असे निर्दशनास आणून दिले आहे. या बाबी संदर्भात मा. उच्च न्यायालयाने गट-अ मध्ये पदोन्नती दिलेले अपात्र अधिकारी व गट-ब मध्ये कार्यरत राहण्यास पात्र नसताना कार्यरत असलेल्या प्रकरणाची तपासणी करुन योग्य तो निर्णय शासनाने स्वत:हून घ्यावा असे निदेश देवून दि. ३०.१.२००८ च्या न्याय निर्णयान्वये याचिका निकाली काढली आहे. सन्मा. उच्च न्यायालयाचे सदर निर्देश लक्षात घेऊन शासनाने सर्व विभागीय आयुक्त यांना शासन पत्र क्र.मविसे १०/ २००८/ प्र.क्र.३०/आस्था-३, दिनांक-१८.११.२००८ च्या पत्रान्वये जे अपात्र अधिकारी गट-अ मध्ये पदोन्नत झालेले आहेत व कार्यरत आहेत तसेच असे अपात्र अधिकारी गट-ब मध्ये कार्यरत आहेत अशा अधिकाऱ्यांच्या संदर्भात त्यांना पदावनत करण्यासंदर्भात कार्यवाही करण्यासंदर्भात तसेच ज्या अधिकाऱ्यांना चूकीने परिक्षा पास होण्यापासून सूट देण्यात आली आहे ते आदेश नियमबाहय ठरत असल्याने अशा अधिकाऱ्यांना दिलेल्या सूट चे आदेश रद्द करण्याबाबत सर्व विभागीय आयुक्तांना कळविण्यात आले होते. तसेच सन्मा. उच्च न्यायालयाचे वर नमुद केलेले आदेश विचारात घेऊन या प्रकरणी खालील मुद्दयांबाबत सामान्य प्रशासन विभागाचे अभिप्राय/ मार्गदर्शन घेण्यात आले.

अ) महाराष्ट्र विकास सेवा गट-अ व गट-ब मधून पदावनत झाल्यांनतर अशा अधिकाऱ्यांचा पुन्हा पदोन्नतीसाठी विचार करावा किंवा कसे ?

ब) विचार करणे आवश्यक असेल तर त्यांचा पदावनती नंतर लगेचच विचार करावयाचा आहे किंवा त्यांनी वयाची ४५ वर्षे पुण केल्यानंतर त्यांचा पुन्हा विचार करावा किंवा कसे?

क) एकदा पदोन्नतीने नियुक्तीची संधी दिल्यानंतर ते वर्ग-२ च्या पदावर नियुक्तीसाठी कायम स्वरुपी अपात्र ठरतील काय ?

ड) पदावनत झाल्यानंतर पद उपलब्ध नसेल तर त्यांना नियुक्ती देण्यासाठी अधिसंख्ये पदे निर्माण करावी किंवा कसे ?

इ) जेथे पदे व्यपगत झाली आहे त्याठिकाणी पदांचे पुर्नजीवन करावे किंवा कसे ?

त्यासंदर्भात सामान्य प्रशासन विभागाने असे स्पष्ट केले आहे की, सन्मा. न्यायालयाच्या निर्णयात स्पष्ट केल्यानुसार विभागीय परिक्षा विहित संधीत व विहित कालावधीत उत्तीर्ण नसताना वा उत्तीर्ण होण्यापासून सूट मिळाली नसताना पदोन्नती दिलेल्या अधिकाऱ्यांना पदावनत करावे किंवा कसे याबाबत विभागाने स्वत:हून निर्णय घ्यायवयाचा आहे. मात्र याप्रमाणे निर्णय घेऊन पदावनत केल्यावर त्यांचा परिक्षा उत्तीर्ण झाल्यावर वा सूट मिळाल्यावर पुन्हा पदोन्नतीसाठी विचार करावा लागेल. अशा अधिकाऱ्यांना पदोन्नतीसाठी कायम स्वरुपी अपात्र ठरविण्याबाबत परिक्षानियामात तरतुद नाही. त्यामुळे त्याना या कारणास्तव पदोन्नतीस अपात्र ठरविता येणार नाही. त्यानुसार हे अधिकारी परिक्षा उत्तीर्ण झाले असतील वा त्याना सूट मिळाली असेल त्यांनतरच्या निवडसूची मध्ये त्यांचे समावेशन प्रवर्गनिहाय पद उपलब्धेनुसार करता येईल. अनुषंगाने नमुद करण्यात येते की, या अगोदर दिनांक-२३.५.२००८ च्या टिपण्णीन्वये सुचविल्यापमाणे प्रस्तुत प्रकरणी उपस्थित झालेला प्रश्न भविष्यात उद्‌भवू नये यादृष्टीने पदोन्नती देण्यापुर्वी सदरहू परिक्षा / विभागीय परिक्षा उत्तीण होणे आवश्यक करण्याची बाब नियमामध्ये नव्याने अंतर्भूत करण्याबाबत विभागाने विचार करावा म्हणजे भविष्यात असा प्रश्न पुन्हा उद्‌भवणार नाही. सदर अभिप्राय विचारात घेऊन मुद्दा क्र. अ ते क बाबत तपासणी करावी मात्र पदावनती नंतर संबधित अधिकाऱ्यांना सामावून घेण्यासाठी अधिसंख्य पद निर्माण करणे आवश्यक वाटत असल्यास त्याबाबत वित्त विभागाच्या सहमतीने निर्णय घ्यावा. याप्रमाणे सामान्य प्रशासन विभागाने दिलेले अभिप्राय / सल्ला विचारात घेऊन त्याप्रमाणे कार्यवाही करण्यास मान्यता घेण्याचा प्रस्ताव शासनास सादर करण्यात आला होता त्यास शासनाची मान्यता प्राप्त झालेली आहे.

त्यानुसार वर नमुद केल्याप्रमाणे चुकीने सुट दिलेले नियमबाहय आदेश रद्द करुन मानीव पदावनत करण्यासंदर्भात अथवा संबधित अधिकाऱ्यांनी परिक्षा पास केल्यानंतर किंवा त्याना ४५ वर्ष पुर्ण झाल्याने सूट मिळाल्यांनतर येणाऱ्या निवडसूचीत समावेशन करण्यासंदर्भात प्रस्ताव सादर करण्याबाबत सर्व विभागीय आयुक्त यांना सूचीत करण्यात आले होते. त्यानुसार सर्व विभागीय आयुक्त यांनी त्यासंदर्भातील प्रस्ताव वरील संदर्भ क्र.२ ते ७ मध्ये नमुद केलेल्या पत्रान्वये सादर केलेले आहेत. सदर प्रस्ताव विचारात घेऊन जे अधिकारी विभागीय परिक्षा पास न होताही गट-अ मध्ये वर्ग-१ च्या पदावर पदोन्नत झाले आहेत. त्यांचे समावेशन त्या अधिकाऱ्यांनी परिक्षा पास केल्यानंतर किंवा नियमाप्रमाणे सुट मिळाल्यानंतर येणाऱ्या निवडसूचीत समावेश करण्यासाठी खालील प्रमाणे जेष्ठता खाली आणण्याचे प्रस्तावीत केले आहे.

१) ज्या अधिकाऱ्यांनी विभागीय परिक्षा विहित वेळेत व विहित संधीत उत्तीर्ण केलेली नाही. अशा अधिकाऱ्यांची नावे प्रस्तावित जेष्ठतासूचीत लाल रंगाने दर्शविण्यात आली असून शेरा या स्तंभामध्ये त्यानी विभागीय परिक्षा विहित वेळेत व विहित संधीत उत्तीर्ण न केल्याने त्यानी जेष्ठता गमावली आहे असे नमुद केले आहे.

२) अशा प्रकारे जेष्ठता गमावल्यानंतर सदर अधिकाऱ्यांची गट-ब मध्ये त्यांनी परिक्षा पास केल्यानंतर किंवा नियमाप्रमाणे सूट मिळाल्यानंतर येणाऱ्या निवडसूचीच्या आधारे त्यांची गट- ब मध्ये जेष्ठता निश्चित करण्यात आली आहे.

३) अशा प्रकारे त्यांची गट-ब मध्ये पदावनती नंतर सुधारीत जेष्ठता निश्चित केल्यानंतर ज्या अधिकाऱ्यांचे निकटचे कनिष्ठतम अधिकारी गट-अ मध्ये वर्ग -१ पदावर पदोन्नत झालेले आहेत. अशा अधिकाऱ्यांचीच त्यांच्या कनिष्ठतम अधिकाऱ्यांच्या अगोदर त्यांची गट-अ मधील पदोन्नतीची जेष्ठता निश्चित करुन त्याची वर्ग-१ मधील सुधारीत जेष्ठता हिरव्या रंगाने दर्शविण्यात आली आहे.

४) विभागीय परिक्षा पास होण्यासंदर्भात सर्वश्री एन.पी.धांडे, आर.व्ही.शिरसाळकर व ए.बी.सावंत या अधिकाऱ्यांनी न्यायालयात प्रकरणे दाखल केलेले असून त्यावर अद्याप अंतीम निर्णय झाला नसल्याने सदर अधिकाऱ्यांची नांवे प्रस्तावित जेष्ठतासूची लाल रंगानी दाखविण्यात आली आहेत. व त्यांच्या नावांसमोर शेरा या स्तंभामध्ये सदर अधिकाऱ्यांनी विभागीय परिक्षा विहीत वेळेत व विहीत संधीत उत्तीर्ण केली नसल्याने त्यांनी जेष्ठता

गमाविली आहे. असे नमुद करण्यात आले आहे तथापि, त्यानी दाखल केलेल्या प्रकरणावर अंतीम निर्णय झालेला नसल्याने सदर अधिकाऱ्यांची सुधारीत जेष्ठता निश्चित करण्यात आलेली नाही.

५) वर्ग-१ मध्ये पदोन्नत झालेल्या परंतु विभागीय परिक्षा विहीत वेळेत व विहीत संधीत उत्तीर्ण केली नाही म्हणून ज्या अधिकाऱ्यांनी जेष्ठता गमावली आहे  तथापि, दरम्यानच्या काळात ज्यांचे निधन झाले आहे अशा अधिकाऱ्यांची नांवे  (सर्वश्री आर.जी.कोल्हेवाड व एम.डी.पेंढारकर ) अंतरिम जेष्ठतासूचीत लाल रंगानी दाखविण्यात आली आहेत व त्यांच्या नावांसमोर शेरा या स्तंभामध्ये सदर अधिकाऱ्यांनी विभागीय परिक्षा विहीत वेळेत व विहीत संधीत पास न केल्याने जेष्ठता गमावली आहे असे नमुद करण्यात आले आहे. तथापि, सदर अधिकाऱ्यांचे निधन झाले असल्याने त्यांची सुधारीत जेष्ठता दाखविण्याची आवश्यकता नसल्याने त्यांची सुधारीत जेष्ठता दाखविण्यात आली नाही.

६) महाराष्ट्र लोकसेवा आयोग पुरस्कृत उमेदवार यांना सन २००९ व सन २०१० मध्ये उप मुख्य कार्यकारी अधिकारी / गट विकास अधिकारी  वर्ग-१ पदावर नियुक्ती दिलेल्या अधिकाऱ्यांचा सदर अंतरिम जेष्ठतायादीत समावेश हा त्या उमेदवारांचा  परिविक्षाधीन कालावधी संपुष्टात आणुन नियुक्ती नियमित करण्याच्या अधीन राहुन करण्यात आलेला आहे.

७) महाराष्ट्र लोकसेवा आयोग पुरस्कृत ज्या उमेदवारांना उप मुख्य कार्यकारी अधिकारी / गट विकास अधिकारी वर्ग-१ पदावर  अद्याप नियुक्ती देण्यात आलेली नाही. अशा अधिकाऱ्यांचा समावेश जेष्ठतासूचीत योग्य वेळी करण्यात येईल .

३.	तसेच वरील परिच्छेद क्रमांक-२ मध्ये नमुद केलेल्या श्री.सोमवंशी व इतर यांनी उच्च न्यायालय मुंबई, खंडपीठ औरंगाबाद येथे दाखल केलेल्या रिट याचिका क्रमांक-४१९७/२००७ व ६४६१/२००७ मध्ये सन्मा.उच्च न्यायालयाने दिनांक-३०.१.२००८ रोजी दिलेल्या निर्णयाची अंमलबजावणी करण्याबाबत शासनास आदेश देण्यासंदर्भात श्री.ए.एस.पाटील व इतर यांनी सन्मा.प्रशासकीय न्यायाधिकरण मुंबई येथे मुळ अर्ज क्रमांक १४८४/२००९  दाखल करुन शासनास सदर निर्णयाची अंमलबजावणी करण्याबाबत आदेश देण्याबाबत मुळ अर्ज दाखल केला  आहे. सदर मुळ अर्जावर सन्मा. न्यायाधिकरणाने  दिनांक-१७.९.२०१० रोजी असे आदेश दिले आहेत की,  "

This O.A. is allowed and a time of three months to complete the process and issued apporopriate order is given from the date of receipt of this order, consindering the fact that Hon. High Court had pass orders on 30.1.2008" सदर निर्देश तसेच सन्मा. उच्च न्यायालयाने रिट याचिका क्रमांक- ४१९७/२००७ व ६४६१/२००७ मध्ये दिनांक- ३०.१.२००८ रोजी दिलेले निर्देश लक्षात घेवून वरील परिच्छेद क्रमांक २ मध्ये नमुद केल्याप्रमाणे जेष्ठतायादी तयार करणे आवश्यक ठरलेले आहे.

४. वरील परिच्छेद क्रमांक १,२ व ३ मध्ये नमुद केलेल्या बाबी लक्षात घेऊन महाराष्ट्र विकास सेवा गट-अ मधील उप मुख्य कार्यकारी अधिकारी / गट विकास अधिकारी वर्ग-१ यांच्या दिनांक- १.१.२००५ ते ३१.१२.२०१० पर्यंतच्या वर्षनिहाय अंतरिम जेष्ठता यादया तयार करुन सोबतच्या प्रपत्रात दर्शविल्याप्रमाणे सन्मा. उच्च न्यायालय मुंबई खंडपीठ, औरंगाबाद येथे प्रलंबित असलेल्या रिट याचिका क्रमांक- २१७८/२००३, २०५५/२००३, ३४६९/२००३, २४६६/२००५ व २९८०/२००५ वरील सन्मा. उच्च न्यायालयाच्या अंतीम निर्णयाच्या अधीन राहून प्रसिध्द करण्यात येत आहेत. तसेच सर्वश्री पी.डी.कासार, एस.ए.ढमाले, बी.ए.शेख, यु.जी.करपे, डी.आर.बारी व यु.एम.खंबाळकर यांच्या जेष्ठता या त्यांनी सन्मा. महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण औरंगाबाद, खंडपीठ औरंगाबाद येथे दाखल केलेल्या मुळ अर्ज क्रमांक-
११३४ /२०००, ८९४ /२००१, ८९५ /२००१, ८९६ / २००१, ८९७ /२००१ आणि अवमान याचिका क्रमांक- ४७/२००४ मध्ये सन्मा. न्यायाधिकरणाने दिलेल्या निर्णयाविरुध्द मा.उच्च न्यायालय औरंगाबाद येथे दाखल केलेल्या रिट याचिका क्रमांक-४७११/२००४ वरील अंतीम निर्णयाच्या व सदर प्रकरणाचा पुर्वोदाहरण म्हणून उपयोग करता येणार नाही. या अटींच्या अधीन राहून जेष्ठता दर्शविण्यात आली आहे.

५. सर्व विभागीय आयुक्त / मुख्य कार्यकारी अधिकारी यांना विनंती करण्यात येते की, त्यांनी सदर जेष्ठता यादीची प्रत आपल्या अधिपत्याखालील महाराष्ट्र विकास सेवा गट-अ मधील सर्व संबधित अधिकाऱ्यांना तसेच त्यांच्या विभागांअंतर्गत प्रतिनियुक्तीवर असलेल्या संबंधित अधिकाऱ्यांना उपलब्ध करुन दयावी व तसे केल्याबाबतची पोच पावती शासनास पाठवावी. याप्रमाणे जेष्ठतायादी प्राप्त झाल्यानंतर संबधित अधिकारी यांनी त्यांच्या जेष्ठतेबाबत काही आक्षेप असल्यास ते आक्षेप एक महिन्याच्या आत संबधित विभागीय आयुक्त यांच्या मार्फत शासनास सादर करावेत. व त्याची एक

अग्रीमप्रत तात्काळ शासनास पाठवावी. **जेष्ठता यादीतील सर्व संबंधित अधिकाऱ्यांना असेही, सूचित करण्यात येते की, त्यांनी त्यांच्या जेष्ठतेसंदर्भात काही आक्षेप असल्यास विहित मुदततीच्या आंत वर नमुद केल्याप्रमाणे सादर करावेत. विहीत मुदतीनंतर वा विलंबाने अत्यंत विलंबाने प्राप्त झालेल्या आक्षेपाचा अजिबात विचार केला जाणार नाही. याची त्यानी नोंद घ्यावी** विभागीय आयुक्त यांनी असे आक्षेप प्राप्त झाल्यानंतर त्यासंदर्भातील अभिप्रायासह आक्षेपाची प्रत शासनास एक आठवडयाच्या आंत शासनास सादर करावी.

६. जेष्ठतासूची संदर्भात शासनाच्या असे निर्दशनास आले आहे की, शासनाकडून निर्गमित केलेली प्रत संबंधित अधिकाऱ्यांना वेळीच उपलब्ध करुन दिली जात नाही. जेष्ठतासूचीची प्रत संबंधित अधिकाऱ्यांना तात्काळ विनाविलंब उपलब्ध करुन देणे अत्यंत आवश्यक आहे. यास्तव सर्व विभागीय आयुक्त / मुख्य कार्यकारी अधिकारी यांनी शासनाकडून निर्गमित केलेल्या अंतरिम जेष्ठतासूची प्रत तात्काळ त्याच्या अधिपत्याखालील सर्व संबधित अधिकाऱ्यांना/ त्यांच्या विभागांतर्गत प्रतिनियुक्तीवर असलेल्या अधिकाऱ्यांना उपलब्ध करुन देण्याची कटाक्षाने दक्षता घ्यावी व तसे करुन त्यासंदर्भातील पोच तात्काळ शासनास सादर करावी. म्हणजे अंतीम जेष्ठता यादी तात्काळ प्रसिध्द करणे शक्य होईल.

७. सदर परिपत्रक त्यासोबतच्या प्रपत्रासह महाराष्ट्र शासनाच्या संकेत स्थळावर उपलब्ध करुन देण्यात आले असुन त्याचा संगणक संकेतांक क्रमांक २०१०१०३०१४०७२०००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

(सरिता बांदेकर-देशमुख)
अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रत-

१. विभागीय आयुक्त (सर्व)
२. संचालक, एकात्मिक बाल विकास सेवा योजना संचालनालय, नवी मुंबई
३. उपायुक्त (आस्थापना), विभागीय आयुक्त कार्यालय (सर्व)
४. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व) (जिल्हा परिषदांतर्गत कार्यतर असलेले सर्व मविसे वर्ग-१ च्या अधिका-यांच्या प्रतीसह )
५. उप मुख्य कार्यकारी अधिकारी (सा.प्र.), जिल्हा परिषद, (सर्व)
६. निवड नस्ती आस्था-३ (ग्राम विकास व जलसंधारण विभाग)

## महाराष्ट्र विकास सेवा वर्ग-१ मधील अधिका-यांची दिनांक ३१. १२. २००५ रोजीची अंतरिम ज्येष्ठता सूची

| अ.क्र. | अधिका-याचे नांव | जन्मतारीख | मविसे वर्ग-१ पदावरील सततची सेवा | सरळसेवा/ पदोन्नती | मविसे मध्ये कायम/ स्थानापन्न | प्रवर्ग | शेरा |
|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ |
| १ | श्री.एन.पी.मित्रगोत्री | ९.५.६३ | १७.११.८६ | स.से.भ. | कायम | --- | --- |
| २ | श्री.एस.डी.मोळवणे | ३०.८.५८ | १४.११.८६ | स.से.भ. | कायम | --- | --- |
| ३ | श्री.एस.एल.हरिदास | १८.५.५६ | ४.११.८६ | स.से.भ. | कायम | --- | --- |
| ४ | श्री.जे.के.गुरव | १२.३.५३ | ११.११.८६ | स.से.भ. | कायम | इ.मा.व. | --- |
| ५ | श्री.पी.ए.देवऋषी | २५.८.६२ | ६.११.८६ | स.से.भ. | कायम | | --- |
| ६ | श्री.बी.एस.जगताप | १.६.५६ | २३.१२.८६ | स.से.भ. | कायम | इ.मा.व. | --- |
| ७ | श्री.बी.डी.पटेल | ६.८.५७ | १९.११.८६ | स.से.भ. | कायम | | --- |
| ८ | श्री.अ.कि.सावरीकर | १२.९.६० | २३.१२.८६ | स.से.भ. | कायम | | --- |
| ९ | श्री.के.एम.नागरगोजे | २७.१२.५७ | १४.११.८६ | स.से.भ. | कायम | भ.ज.(ड) | --- |
| १० | श्री.ए.एस.जगताप | १.६.५८ | ८.१.८७ | स.से.भ. | कायम | भ.ज.(ब) | --- |
| ११ | श्री.जी.के.धनाशिरे | १८.९.५५ | ५.१२.८६ | स.से.भ. | कायम | अ.जा. | सेवतून बडतर्फ २००४ |
| १२ | श्री.एस.के.तिटकारे | १.६.५७ | ६.११.८६ | स.से.भ. | कायम | अ.ज. | --- |
| १३ | श्री.एम.एस.जगताप | ३०.१.५६ | १०.११.८६ | स.से.भ. | कायम | अ.ज. | --- |
| १४ | श्री.आर.डी.जवळेकर | ८.११.६० | १.१२.८७ | स.से.भ. | कायम | --- | --- |
| १५ | श्री.एन.एस.ननावरे | १५.७.५९ | ७.१२.८७ | स. से. भ. | कायम | --- | --- |
| १६ | श्री.पी.एस.मार्कंडेय | १७.६.६० | ६.११.८७ | स. से. भ. | कायम | भ.ज.(क) | --- |
| १७ | श्री.डी.जी.म्हैसेकर | १२.७.६० | २७.११.८७ | स. से. भ. | कायम | --- | --- |
| १८ | श्री.ए.एल.दुबे | ३.४.६२ | ८.१२.८७ | स. से. भ. | कायम | --- | --- |
| १९ | श्री.एस.के.बनकर | ११.४.६१ | २७.११.८७ | स. से. भ. | कायम | --- | --- |
| २० | श्री.ए.बी.लांडगे | २.६.६१ | १८.११.८७ | स. से. भ. | कायम | ---- | --- |
| २१ | श्री.डी.जी.चौधरी | १७.५.६१ | १२.११.८७ | स. से. भ. | कायम | ---- | --- |
| २२ | श्री.एन.के.जेजुरकर | ५.४.६१ | ६.११.८७ | स. से. भ. | कायम | ---- | --- |

| अ.क्र. | अधिका-याचे नांव | जन्मतारीख | मविसे वर्ग-१ पदावरील सततची सेवा | सरळसेवा/ पदोन्नती | मविसे मध्ये कायम/ स्थानापन्न | प्रवर्ग | शेरा |
|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ |
| २३ | श्री.डी.डी.शिंदे | २४.६.६५ | २३.११.८७ | स. से. भ. | कायम | अ.जा. | --- |
| २४ | श्री.पी.व्ही.बनसोडे | १७.६.६१ | १६.११.८७ | स. से. भ. | कायम | अ.जा. | --- |
| २५ | श्री.जी.डी.राठोड | ३.२.५८ | १.१२.८७ | स. से. भ. | कायम | वि.जा.(अ) | --- |
| २६ | श्री.पी.टी.राजगडकर | १२.१२.५६ | १७.११.८७ | स. से. भ. | कायम | अ.ज. | --- |
| २७ | श्री.एस.एम.केंद्रेकर | १३.५.६५ | २६.७.८९ | स.से.भ. | कायम | --- | --- |
| २८ | श्री.ए.एस.चव्हाण | २०.३.६१ | ६.७.८९ | स.से.भ. | कायम | --- | --- |
| २९ | श्री.व्ही.व्ही.गुजर | १४.६.५९ | १७.६.८९ | स.से.भ. | कायम | --- | --- |
| ३० | श्री.ए.जी.गोटे | २४.३.६४ | ३.७.८९ | स.से.भ. | कायम | --- | --- |
| ३१ | श्री.डी.एस.पाटील | २५.४.६० | ७.७.८९ | स.से.भ. | कायम | --- | --- |
| ३२ | श्री.एस.बी.हजारे | १५.३.६५ | ५.७.८९ | स.से.भ. | कायम | --- | --- |
| ३३ | श्री.ए.डी.कोल्हे | १८.९.६२ | ६.७.८९ | स.से.भ. | कायम | --- | --- |
| ३४ | श्री.बी.बी.शेंडगे | १.६.६४ | ३०.७.८९ | स.से.भ. | कायम | --- | --- |
| ३५ | श्रीमती एस.के.अगरवाल | १३.२.६३ | १८.७.८९ | स.से.भ. | कायम | --- | --- |
| ३६ | श्री.ए.जी.नवाळे | १.६.६४ | १०.७.८९ | स.से.भ. | कायम | --- | --- |
| ३७ | श्री.आर.पी.झेंडे | २६.५.६३ | १८.७.८९ | स.से.भ. | कायम | --- | --- |
| ३८ | श्री.पी.ए.बोथरा | १३.२.६२ | ७.७.८९ | स.से.भ. | कायम | --- | --- |
| ३९ | श्री.के.एम.अहमद | २३.८.६० | १७.७.८९ | स.से.भ. | कायम | --- | --- |
| ४० | श्री.पी.बी.पाटील | २.६.६३ | ७.८.८९ | स.से.भ. | कायम | --- | --- |
| ४१ | डॉ.एन.बी.गिते | २७.५.६१ | १८.७.८९ | स.से.भ. | कायम | भ.ज.(ड) | --- |
| ४२ | श्री.व्ही.जी.सांळुके | ५.५.६१ | १७.७.८९ | स.से.भ. | कायम | --- | --- |
| ४३ | श्री.एम.एस.कलशेट्टी | १५.८.६१ | २०.७.८९ | स.से.भ. | कायम | --- | --- |
| ४४ | श्री.वाय.व्ही.शितोळे | २६.१२.५९ | २७.७.८९ | स.से.भ. | कायम | --- | --- |
| ४५ | श्री.एस.ई.ए.हाश्मी | १९.३.६२ | १.७.८९ | स.से.भ. | कायम | --- | --- |
| ४६ | श्री.एस.एस.चव्हाण | २४.५.६४ | १.७.८९ | स.से.भ. | कायम | --- | --- |

| अ.क्र. | अधिका-याचे नांव | जन्मतारीख | मविसे वर्ग-१ पदावरील सततची सेवा | सरळसेवा/ पदोन्नती | मविसे मध्ये कायम/ स्थानापन्न | प्रवर्ग | शेरा |
|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ |
| ४७ | श्री.ए.वाय.जाधव | १.९.५५ | ३१.७.८९ | स.से.भ. | कायम | अनु.जाती | --- |
| ४८ | श्री.एम.एल.थाडे | २४.८.६० | १०.७.८९ | स.से.भ. | कायम | --- | --- |
| ४९ | श्री.एस.एस.वाळके | १९.११.६० | १०.७.८९ | स.से.भ. | कायम | अनु.जाती | --- |
| ५० | श्री.के.ए.परदेशी | ५.५.५७ | १.७.८९ | स.से.भ. | कायम | वि.जा.भ.ज. | --- |
| ५१ | श्री.सी.आर.वळवी | १.६.६१ | २४.७.८९ | स.से.भ. | कायम | अनु.जमाती | कार्यरत दिसत नाहीत. |
| ५२ | श्री.यु.एस.चव्हाण | १२.१२.५२ | ९.६.८४ | --- | कायम | विमुक्तजाती | --- |
| ५३ | श्री.व्ही.के.जाधव | ५.६.५० | १५.६.८४ | --- | कायम | अनु.जमाती | --- |
| ५४ | श्री.एस.जी.वाघमारे | १.१०.५० | १०.३.८९ | ---- | कायम | अ.जा. | शासन आदेश क्र. मविसे-१०९७/प्र.क्र.२४८१/आस्था-३ दि.७. ६. २००६ नुसार मानीव दिनांक दिल्यामुळे |
| ५५ | श्री.एम.एल.वाघमारे | १.६.४९ | २८.११.८४ | --- | कायम | अनु.जाती | --- |
| ५६ | श्री.व्ही.एस.बर्डे | २३.८.५० | २९.११.८४ | --- | कायम | अनु.जाती | --- |
| ५७ | श्री.एच.व्ही.जाधव | २०.२.५१ | २१.११.८४ | --- | कायम | अनु.जाती | --- |
| ५८ | श्री.डी.एम.ठाकूर | ११.६.६८ | २०.११.८४ | --- | कायम | अनु.जमाती | कार्यरत दिसत नाही |
| ५९ | श्री.आर.यु.अवचार | २२.१०.६४ | ६.७.९२ | स.से.भ. | कायम | अ.जा. | --- |
| ६० | श्री.एस.बी.बेदमुथा | १.६.६७ | १८.७.९२ | स.से.भ. | कायम | -- | --- |
| ६१ | श्री.जी.एम.चौधरी | ६.५.६३ | २२.७.९२ | स.से.भ. | कायम | इ.मा.व. | --- |
| ६२ | श्री.सी.जे.गुडेवार | ४.१२.६५ | १.७.९२ | स.से.भ. | कायम | वि.मा.प्र. | --- |
| ६३ | श्री.आर.ए.पाटील | २.६.६८ | २७.७.९२ | स.से.भ. | कायम | -- | --- |
| ६४ | श्री.ए.एस.मोरे | २.१०.६६ | १४.७.९२ | स.से.भ. | कायम | अ.जा. | --- |
| ६५ | श्री.एस.जे.कापडणीस | १५.४.६८ | ६.७.९२ | स.से.भ. | कायम | इ.मा.व. | --- |
| ६६ | श्री.ए.बी.केदार | ९.१.६४ | ७.७.९२ | स.से.भ. | कायम | भ.ज.(ड) | --- |
| ६७ | श्री.बी.बी.नेमाने | १.१०.६६ | २३.७.९२ | स.से.भ. | कायम | -- | --- |
| ६८ | श्री.आर.यू.शिंदे | ८.३.६८ | २८.७.९२ | स.से.भ. | कायम | -- | --- |
| ६९ | श्री.एस.एस.पवार | २६.११.६६ | ७.७.९२ | स.से.भ. | कायम | इ.मा.व. | --- |
| ७० | श्री.ए.टी.गुंडे | ८.२.६८ | ९.७.९२ | स.से.भ. | कायम | वि.जा/भ.ज | --- |

| अ.क्र. | अधिका-याचे नांव | जन्मतारीख | मविसे वर्ग-१ पदावरील सततची सेवा | सरळसेवा/ पदोन्नती | मविसे मध्ये कायम/ स्थानापन्न | प्रवर्ग | शेरा |
|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ |
| ७१ | श्री.बी.एन.उबाळे | १.६.५८ | ३०.७.९२ | स.से.भ. | कायम | अ.जा. | --- |
| ७२ | श्री.ए.एस.माने | ३०.९.६६ | १४.७.९२ | स.से.भ. | कायम | वि.जा.भ.ज. | --- |
| ७३ | श्री.एच.टी.जगताप | ५.६.६१ | १.८.९२ | स.से.भ. | कायम | अ.जा. | --- |
| ७४ | श्री.पी.आर.शेळके | ५.६.४८ | ४.६.८७ | पदोन्नती | कायम | अ.जा. | --- |
| ७५ | श्री.एच.एस.वसेकर | १२.०८.६७ | २७.०८.९३ | स.से.भ. | कायम | -- | --- |
| ७६ | डॉ.व्ही.एम.घोरपडे | ०६.०७.६५ | २६.०८.९३ | स.से.भ. | कायम | -- | --- |
| ७७ | श्री.जी.डी.भालेराव | ०७.०५.६९ | ०१.०९.९३ | स.से.भ. | कायम | -- | --- |
| ७८ | श्री.एस.डी.कुलकर्णी | १६.०९.६८ | ३०.०८.९३ | स.से.भ. | कायम | -- | --- |
| ७९ | श्री.आय.डी.देशमुख | २५.१०.६६ | २४.०८.९३ | स.से.भ. | कायम | -- | --- |
| ८० | श्री.एस.बी.लांगोरे | ०७.०७.६७ | २७.०८.९३ | स.से.भ. | कायम | -- | --- |
| ८१ | श्री.जे.एस.इनामदार | २४.०५.६३ | १९.०८.९३ | स.से.भ. | कायम | इ.मा.व. | --- |
| ८२ | श्री.ए.टी.सणस | ०३.०९.६५ | १०.०९.९३ | स.से.भ. | कायम | -- | --- |
| ८३ | श्री.व्ही.पी.केळकर | १८.०१.६४ | १०.०९.९३ | स.से.भ. | कायम | -- | --- |
| ८४ | श्री.एस.एम.गायकवाड | २०.०७.६८ | १९.०८.९३ | स.से.भ. | कायम | -- | --- |
| ८५ | श्री.एम.एस.पाटील | १६.०६.६४ | ३०.०८.९३ | स.से.भ. | कायम | -- | कार्यरत दिसन नाही. |
| ८६ | श्री.डी.डी.डोके | ११.०६.६६ | ०९.०९.९३ | स.से.भ. | कायम | इ.मा.व. | --- |
| ८७ | श्री.आर.बी.पवार | ०५.०३.६६ | ०१.११.९३ | स.से.भ. | कायम | इ.मा.व. | कार्यरत दिसन नाही. |
| ८८ | श्री.व्ही.एन.पाटील | ०९.१२.६३ | ०१.०९.९३ | स.से.भ. | कायम | इ.मा.व. | --- |
| ८९ | श्री.एस.एस.मोखाडे | ०२.०६.६५ | १८.१०.९३ | स.से.भ. | कायम | अनु.जाती | कार्यरत दिसन नाही. |
| ९० | श्री.आर.के.बामणे | ०५.०१.६२ | १०.०९.९३ | स.से.भ. | कायम | अनु.जाती | --- |
| ९१ | श्री.यू.ए.कोमवाड | ०५.०८.६७ | २०.०८.९३ | स.से.भ. | कायम | अनु.जमाती | --- |
| ९२ | श्री.बी.एन.भामरे | १.४.४९ | २६.६.८७ | पदोन्नती | कायम | अ.जा. | ---- |
| ९३ | श्री.एम.बी.बच्छाव | १.६.५० | २५.११.८७ | पदोन्नती | कायम | अ.जा. | --- |
| ९४ | श्री.टी.पी.सुर्यवंशी | ३.७.४८ | १.१२.८७ | पदोन्नती | कायम | अ.जा. | --- |

| अ.क्र. | अधिका-याचे नांव | जन्मतारीख | मविसे वर्ग-१ पदावरील सततची सेवा | सरळसेवा/ पदोन्नती | मविसे मध्ये कायम/ स्थानापन्न | प्रवर्ग | शेरा |
|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ |
| ९५ | श्री डी.टी.पवार | २६.९.४९ | १९.४.८८ | पदोन्नती | कायम | --- | --- |
| ९६ | श्री.बी.एम.वराळे | १०.६.५४ | २१.२.८९ | पदोन्नती | कायम | खुला | (दिनांक २१.२.८९ हा मानीव दिनांक मंजूर करण्यात आला आहे. |
| ९७ | श्री.ए.जी.वाजे | ८.८.५३ | २१.२.८९ | पदोन्नती | कायम | --- | --- |
| ९८ | श्री.आर.पी.सव्वालाखे | १.२.५१ | २.७.९४ | पदोन्नती | कायम | इ.मा.व. | (दिनांक ४.७.८९ हा मानीव दिनांक मंजूर करण्यात आला आहे. |
| ९९ | श्री.ए.जी.शुक्ला | १६.५.५५ | ४.७.८९ | पदोन्नती | कायम | --- | --- |
| १०० | श्री.एस.बी.बेजलवार | ७.५.५६ | १०.७.८९ | पदोन्नती | कायम | इ.मा.व. | --- |
| १०१ | श्री.ए.आर.शेख | २.५.५३ | २९.४.८९ | पदोन्नती | कायम | --- | --- |
| १०२ | श्री.एन.एम.रासकर | २५.७.५७ | २९.६.८९ | पदोन्नती | कायम | इ.मा.व. | --- |
| १०३ | श्री.एस.पी.गेडाम | १०.३.५३ | २७.७.८९ | पदोन्नती | कायम | --- | --- |
| १०४ | श्री.एस.डी.सोनार | ८.६.५३ | २९.६.८९ | पदोन्नती | कायम | इ.मा.व. | --- |
| १०५ | श्री.एस.एस.खाडे | २०.५.५१ | २९.६.८९ | पदोन्नती | कायम | --- | --- |
| १०६ | श्री.एस.डी.बनसोडे | ६.१२.५६ | २९.६.८९ | पदोन्नती | कायम | इ.मा.व. | --- |
| १०७ | श्री.ए.एच.बगाटे | १.६.५५ | २९.६.८९ | पदोन्नती | कायम | --- | --- |
| १०८ | श्री.एन.बी.धुमाळ | १.३.५१ | २९.६.८९ | पदोन्नती | कायम | इ.मा.व. | --- |
| १०९ | श्री.एस.आर.शिंदे | ३.८.५४ | २९.६.८९ | पदोन्नती | कायम | --- | --- |
| ११० | श्री.एन.डी.पठाण | १.१.५४ | २९.६.८९ | पदोन्नती | कायम | --- | --- |
| १११ | श्री.डी.आर.टक्ले | १२.७.५३ | २७.७.८९ | पदोन्नती | कायम | --- | --- |
| ११२ | श्री.एस.जी.राणे | १.६.४९ | २८.७.८९ | पदोन्नती | कायम | --- | --- |
| ११३ | श्री.एच.पी.मुळुक | १.६.५५ | २८.७.८९ | पदोन्नती | कायम | खुला | (दिनांक-२८.७.८९ हा मानीव दिनांक मंजूर करण्यात आला आहे.) |
| ११४ | श्री.पी.डी.कासार | १.६.५४ | २८.७.८९ | पदोन्नती | कायम | खुला | विचाराधीन अंतरिम जेष्ठतेबाबतच्या परिपत्रकातील परि. क्र.१ पहावा. |
| ११५ | श्री.टी.डब्ल्यू.कोहीनकर | १.६.५७ | २८.७.८९ | पदोन्नती | कायम | --- | --- |
| ११६ | श्री.आर.बी.पाटील | २५.९.५३ | २६.७.८९ | पदोन्नती | कायम | --- | --- |
| ११७ | श्री.एस..बी.भोकरे | ३०.५.५४ | १.९.८९ | पदोन्नती | कायम | --- | --- |

| अ.क्र. | अधिका-याचे नांव | जन्मतारीख | मविसे वर्ग-१ पदावरील सततची सेवा | सरळसेवा/ पदोन्नती | मविसे मध्ये कायम/ स्थानापन्न | प्रवर्ग | शेरा |
|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ |
| ११८ | श्री.एस.ए.ढमाले | १.६.५३ | २८.७.८९ | पदोन्नती | कायम | खुला | विचाराधीन अंतरिम जेष्ठतेबाबतच्या परिपत्रकातील परि. क्र.१ पहावा. |
| ११९ | श्री.बी.ए.शेख | १.७.५५ | २८.७.८९ | पदोन्नती | कायम | खुला | विचाराधीन अंतरिम जेष्ठतेबाबतच्या परिपत्रकातील परि. क्र.१ पहावा. |
| १२० | श्री.यु.जी.करपे | १.६.५५ | २८.७.८९ | पदोन्नती | कायम | खुला | विचाराधीन अंतरिम जेष्ठतेबाबतच्या परिपत्रकातील परि. क्र.१ पहावा. |
| १२१ | श्री.डी.आर.बारी | २३.१०.५२ | २८.७.८९ | पदोन्नती | कायम | इ.मा.व. | विचाराधीन अंतरिम जेष्ठतेबाबतच्या परिपत्रकातील परि. क्र.१ पहावा. |
| १२२ | श्री.यु.एम.खंबाळकर | १.६.५५ | २८.७.८९ | पदोन्नती | कायम | खुला | विचाराधीन अंतरिम जेष्ठतेबाबतच्या परिपत्रकातील परि. क्र.१ पहावा. |
| १२३ | श्री.बी.आर.चव्हाण | ४.६.४८ | २९.५.९० | पदोन्नती | कायम | वि.जा.भ.ज. | --- |
| १२४ | श्री. पी.एस.शिंदे | १२.४.७५ | १३.४.९९ | स.से.भ. | कायम | खुला | --- |
| १२५ | श्री.आर.बी.दिघे | १.६.७१ | १३.४.९९ | स.से.भ. | कायम | खुला | --- |
| १२६ | श्री.बी.एम.मोहन | १८.११.६९ | १३.४.९९ | स.से.भ. | कायम | अ.जा. | --- |
| १२७ | श्रीमती लीना बनसोड | १५.११.७३ | १.६.९९ | स.से.भ. | कायम | खुला | --- |
| १२८ | श्री.आर.के.वाघ | २.६.५२ | २२.८.९५ | पदोन्नती | कायम | इ.मा.व. | शासन आदेश क्रमांक-मविसे-१०/ २००२/प्र क्र ३८७८/ आस्था-३, दि-११.१२.२००६ नुसार मानीव दिनांक दिल्यामुळे |
| १२९ | श्री.एच.बी.सहारे | २५.६.५६ | १२.६.९० | पदोन्नती | कायम | अनु.जाती | --- |
| १३० | श्री.डी.बी.सुर्यवंशी | १२.२.४७ | १३.६.९० | पदोन्नती | कायम | अनु.जाती | सेवानिवृत्त होणार-२००५ |
| १३१ | श्री.आर.एम.गावीत | ७.६.५५ | २६.६.९० | पदोन्नती | कायम | अनु.जमाती | --- |
| १३२ | श्री.जी.बी.बेहळे | १७.७.५३ | २६.६.९० | पदोन्नती | कायम | अनु.जमाती | --- |
| १३३ | श्री.ए.ए.कोठावाला | १५.११.५५ | ७.५.९१ | पदोन्नती | कायम | खुला | --- |
| १३४ | श्री.टी.आर.गुरव | १.६.५६ | ६.५.९१ | पदोन्नती | कायम | इ.मा.व. | --- |
| १३५ | श्री.के.एल.झळके | १.७.४९ | १६.१२.९१ | पदोन्नती | कायम | इ.मा.व. | --- |
| १३६ | श्री.ए.सी.शहाडे | ४.१२.४७ | २७.१.९२ | पदोन्नती | कायम | खुला | सेवानिवृत्त होणार-२००५ |
| १३७ | श्री.व्ही.व्ही.चव्हाण | १८.५.५० | २८.४.९२ | पदोन्नती | कायम | अ.जा. | --- |
| १३८ | श्री.डी.जी.पवार | १.३.५३ | ११.२.९२ | पदोन्नती | कायम | अ.जा. | --- |
| १३९ | श्री.आर.बी.मडावी | ५.१२.५२ | ९.३.९२ | पदोन्नती | कायम | अ.ज. | --- |
| १४० | श्री.आर.एस.मांढरे | १२.३.४७ | ९.४.९२ | पदोन्नती | कायम | वि.जा.भ.ज. | सेवानिवृत्त होणार-२००५ |

| अ.क्र. | अधिका-याचे नांव | जन्मतारीख | मविसे वर्ग-१ पदावरील सततची सेवा | सरळसेवा/ पदोन्नती | मविसे मध्ये कायम/ स्थानापन्न | प्रवर्ग | शेरा |
|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ |
| १४१ | श्री.ए.टी.राऊत | २४.१२.५१ | १२.२.९३ | पदोन्नती | कायम | खुला | --- |
| १४२ | श्री.व्ही.एस.भोसले | १.४.७५ | २५.९.२००२ | स.से.भ. | कायम | खुला | --- |
| १४३ | श्री.एम.जी.सावेडकर | १६.१.७६ | २५.९.२००२ | स.से.भ. | कायम | खुला | -- |
| १४४ | श्री.वाय.एस.महांगडे | ९.५.७५ | २५.९.२००२ | स.से.भ. | कायम | खुला | -- |
| १४५ | श्री.एस.आर.पाठारे | १३.७.७८ | २५.९.२००२ | स.से.भ. | कायम | खुला | -- |
| १४६ | श्री.आर.के.साकोरे | २२.१२.७६ | २५.९.२००२ | स.से.भ. | कायम | खुला | -- |
| १४७ | श्री.एस.टी.चाळके | २०.१२.७५ | २५.९.२००२ | स.से.भ. | कायम | खुला | -- |
| १४८ | श्री.व्ही.पी.जाधव | १.६.७५ | २५.९.२००२ | स.से.भ. | कायम | खुला | -- |
| १४९ | श्री.एम.एल.दिवे | २७.७.७४ | २५.९.२००२ | स.से.भ. | कायम | खुला | -- |
| १५० | श्री.पी.एम.राऊत | २८.१२.७४ | २५.९.२००२ | स.से.भ. | कायम | खुला | -- |
| १५१ | श्री.व्ही.एस.मुळीक | २३.५.७५ | २५.९.२००२ | स.से.भ. | कायम | खुला | -- |
| १५२ | श्री.डी.एन.चव्हाण | १.६.७० | २५.९.२००२ | स.से.भ. | कायम | खुला | -- |
| १५३ | श्री.आर.बी.सोमवंशी | २०.१.७५ | २५.९.२००२ | स.से.भ. | कायम | खुला | -- |
| १५४ | श्री.एस.डी.जोशी | १९.२.७५ | २५.९.२००२ | स.से.भ. | कायम | खुला | -- |
| १५५ | श्री.ए.एस.भंडारी | ३.६.७५ | २५.९.२००२ | स.से.भ. | कायम | खुला | -- |
| १५६ | श्री.एस.व्ही.कवडे | २५.६.७४ | २५.९.२००२ | स.से.भ. | कायम | खुला | -- |
| १५७ | श्री.सी.एन.वाघमारे | ३.१.७६ | २५.९.२००२ | स.से.भ. | कायम | खुला | -- |
| १५८ | श्री.एस.जी.माळोदे | ७.५.७७ | २५.९.२००२ | स.से.भ. | कायम | खुला | -- |
| १५९ | श्री.एन.एस.माने | १५.२.७४ | २५.९.२००२ | स.से.भ. | कायम | खुला | -- |
| १६० | श्री.एस.पी.निकम | २४.७.६७ | २५.९.२००२ | स.से.भ. | कायम | इ.मा.व. | नेमणुक दिलेली नाही. |
| १६१ | श्री.एस.डी.बडे | २९.६.७३ | २५.९.२००२ | स.से.भ. | कायम | भ.ज-ड | -- |
| १६२ | श्री.व्ही.डी.महाले | १.९.७७ | २५.९.२००२ | स.से.भ. | कायम | इ.मा.व. | -- |
| १६३ | श्री.के.एस.फुटाणे | ७.१०.७५ | २५.९.२००२ | स.से.भ. | कायम | इ.मा.व. | -- |
| १६४ | श्री.व्ही.एस.इळमे | २५.१०.७४ | २५.९.२००२ | स.से.भ. | कायम | इ.मा.व. | -- |

| अ.क्र. | अधिका-याचे नांव | जन्मतारीख | मविसे वर्ग-१ पदावरील सततची सेवा | सरळसेवा/ पदोन्नती | मविसे मध्ये कायम/ स्थानापन्न | प्रवर्ग | शेरा |
|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ |
| १६५ | श्री.ए.एस.सोनवणे | १.६.७६ | २५.९.२००२ | स.से.भ. | कायम | इ.मा.व. | -- |
| १६६ | श्री.पी.एस.भामरे | १८.५.७६ | २५.९.२००२ | स.से.भ. | कायम | इ.मा.व. | -- |
| १६७ | श्रीमती पी.सी.कोल्हटकर | ३१.५.७८ | २५.९.२००२ | स.से.भ. | कायम | खुला | -- |
| १६८ | श्रीमती एम.जी.सपकाळ | १.६.७६ | २५.९.२००२ | स.से.भ. | कायम | खुला | -- |
| १६९ | श्री.एस.व्ही.धोत्रे | ६.६.७६ | २५.९.२००२ | स.से.भ. | कायम | वि.जा.अ. | -- |
| १७० | श्रीमती एस.डी.चौरेवार | ६.१२.७६ | २५.९.२००२ | स.से.भ. | कायम | खुला | -- |
| १७१ | श्रीमती व्ही.बी.बावके | २६.३.७१ | २५.९.२००२ | स.से.भ. | कायम | खुला | -- |
| १७२ | श्रीमती पी.पी.शिंदे | १३.५.७९ | २५.९.२००२ | स.से.भ. | कायम | खुला | -- |
| १७३ | श्रीमती डी.एस.देशपांडे | ६.६.७६ | २५.९.२००२ | स.से.भ. | कायम | खुला | -- |
| १७४ | श्रीमती के.बी.क्षिरसागर | ५.६.७४ | २५.९.२००२ | स.से.भ. | कायम | खुला | -- |
| १७५ | श्रीमती एम.व्ही.शिंदे | १.६.७२ | २५.९.२००२ | स.से.भ. | कायम | खुला | -- |
| १७६ | श्री.व्ही.के.ठमके | १०.४.७४ | २५.९.२००२ | स.से.भ. | कायम | अ.जा. | -- |
| १७७ | श्री.आर.डी.शेंडगे | १.६.७५ | २५.९.२००२ | स.से.भ. | कायम | भ.ज.क | -- |
| १७८ | श्री.एन.एन.उदमले | २४.१.७९ | २५.९.२००२ | स.से.भ. | कायम | अ.जा. | -- |
| १७९ | श्रीमती एस.वाय.देसाई | १७.६.७३ | २५.९.२००२ | स.से.भ. | कायम | खुला | -- |
| १८० | श्री.डी.ए.वानखेडे | २३.१.७६ | २५.९.२००२ | स.से.भ. | कायम | अ.जा. | -- |
| १८१ | श्री.व्ही.व्ही.बागडे | १८.२.७७ | २५.९.२००२ | स.से.भ. | कायम | अ.जा. | -- |
| १८२ | श्रीमती व्ही.जी.गौरकर | २४.११.७४ | २५.९.२००२ | स.से.भ. | कायम | इ.मा.व. | -- |
| १८३ | श्री.ए.एम.शिरसे | ५.३.६८ | २५.९.२००२ | स.से.भ. | कायम | अ.जा. | -- |
| १८४ | श्री.आर.पी.पाटील | ९.८.७० | २५.९.२००२ | स.से.भ. | कायम | इ.मा.व. | -- |
| १८५ | श्रीमती आर.एस.सातपुते | १.६.७७ | २५.९.२००२ | स.से.भ. | कायम | वि.मा.प्र. | -- |
| १८६ | श्रीमती एस.पी.धोटे | १०.१.७४ | २५.९.२००२ | स.से.भ. | कायम | इ.मा.व. | -- |
| १८७ | श्रीमती पी.एस.संगमनेरे | १.३.७२ | २५.९.२००२ | स.से.भ. | कायम | इ.मा.व. | -- |
| १८८ | श्री.पी.डी.यादव | १२.१०.७८ | २५.९.२००२ | स.से.भ. | कायम | खुला | -- |

| अ.क्र. | अधिका-याचे नांव | जन्मतारीख | मविसे वर्ग-१ पदावरील सततची सेवा | सरळसेवा/ पदोन्नती | मविसे मध्ये कायम/ स्थानापन्न | प्रवर्ग | शेरा |
|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ |
| १८९ | श्री.एम.व्ही.मेघमाळे | ३.४.७४ | २५.९.२००२ | स.से.भ. | कायम | अ.ज. | -- |
| १९० | श्री.ए.एस.शेंगुलवार | ७.२.७७ | २५.९.२००२ | स.से.भ. | कायम | अ.ज. | -- |
| १९१ | श्रीमती के.पी.किल्लारीकर | ३०.८.७५ | २५.९.२००२ | स.से.भ. | कायम | अ.जा. | -- |
| १९२ | श्री.पी.आर.पवार | १.२.७५ | २५.९.२००२ | स.से.भ. | कायम | भ.ज.ब. | -- |
| १९३ | श्रीमती एन.बी.घाणेकर | ६.९.६९ | २५.९.२००२ | स.से.भ. | कायम | अ.जा. | -- |
| १९४ | श्रीमती एस.जी.पाटील | १७.७.७३ | २५.९.२००२ | स.से.भ. | कायम | भ.ज.क. | -- |
| १९५ | श्री.एस.पी.लोखंडे | १९.४.७७ | २५.९.२००२ | स.से.भ. | कायम | अ.ज. | -- |
| १९६ | श्रीमती एस.डी.लोंढे | २.६.७८ | २५.९.२००२ | स.से.भ. | कायम | अ.ज. | -- |
| १९७ | श्रीमती सी.यु.शिसोदे | ७.४.७३ | २५.९.२००२ | स.से.भ. | कायम | वि.जा.अ. | --- |
| १९८ | श्री.व्ही.पी.कुंभार | २७.१.५८ | २४.२.९३ | पदोन्नती | कायम | इ.मा.व. | --- |
| १९९ | श्री.एस.डी.चव्हाण | २९.५.५७ | २२.२.९३ | पदोन्नती | कायम | खुला | --- |
| २०० | श्री.टी.आर.गारळे | १.६.५३ | २३.२.९३ | पदोन्नती | कायम | भ.ज.क. | --- |
| २०१ | श्री.एस.ए.वाय.खान पठाण | ७.६.५५ | ९.३.९३ | पदोन्नती | कायम | खुला | --- |
| २०२ | श्री.एस.डी.पाटील | ६.१२.५८ | ६.३.९३ | पदोन्नती | कायम | इ.मा.व. | --- |
| २०३ | श्री.जे.ई.पवार | २५.९.५६ | २४.२.९३ | पदोन्नती | कायम | खुला | --- |
| २०४ | श्री.के.डी.बोने | ९.२.५६ | ९.२.९३ | पदोन्नती | कायम | खुला | --- |
| २०५ | श्री.एम.एन.वायंगणकर | ३१.१०.५४ | २०.२.९३ | पदोन्नती | कायम | अ.जा. | --- |
| २०६ | श्री.पी.एच.राठोड | २.४.५६ | २८.२.९३ | पदोन्नती | ------ | वि.जा.भ.ज. | वि.प.विहीत वेळेत व संधीत पास न झाल्याने ज्येष्ठता गमावली आहे. |
| २०७ | श्री.सी.एन.इंगळे | २०.१०.५३ | २८.२.९३ | पदोन्नती | कायम | अ.जा. | --- |
| २०८ | श्री.एल.एन.कानडे | १.१.५४ | ६.३.९३ | पदोन्नती | कायम | अ.जा. | --- |
| २०९ | श्री.एस.जी.दिक्षित | ९.७.५३ | २९.६.९४ | पदोन्नती | कायम | खुला | --- |
| २१० | श्री.जे.आर.तेलखडे | २८.२.५२ | १३.७.९४ | पदोन्नती | कायम | अ.ज. | --- |
| २११ | श्री.आर.बी.गायकवाड | १.६.५३ | २४.६.९४ | पदोन्नती | कायम | अ.जा. | --- |

| अ.क्र. | अधिका-याचे नांव | जन्मतारीख | मविसे वर्ग-१ पदावरील सततची सेवा | सरळसेवा/ पदोन्नती | मविसे मध्ये कायम/ स्थानापन्न | प्रवर्ग | शेरा |
|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ |
| २१२ | श्री.एम.एस.सवादकर | १.११.५४ | १६.६.९४ | पदोन्नती | कायम | अ.जा. | --- |
| २१३ | श्री.एस.ए.कौसाडीकर | १२.७.५९ | २२.८.९५ | पदोन्नती | कायम | खुला | --- |
| २१४ | श्री.व्ही.जी.पुजारी | १८.९.६२ | २२.८.९५ | पदोन्नती | कायम | खुला | --- |
| २१५ | श्री.बी.टी.कदम | १.७.५८ | २२.८.९५ | पदोन्नती | कायम | खुला | --- |
| २१६ | श्री.जी.एम.जाधव | ३१.८.५६ | २२.८.९५ | पदोन्नती | कायम | खुला | --- |
| २१७ | श्री.एस.एस.सुर्यवंशी | १६.१.५४ | २२.८.९५ | पदोन्नती | कायम | इ.मा.व. | --- |
| २१८ | श्री.डी.व्ही.निला | ५.४.६१ | २२.८.९५ | पदोन्नती | कायम | खुला | --- |
| २१९ | श्री.एस.एस.मस्कर | २१.७.६१ | २२.८.९५ | पदोन्नती | कायम | खुला | --- |
| २२० | श्री.एस.आर. जाधव | १.३.५९ | २२.८.९५ | पदोन्नती | कायम | खुला | (दिनांक- २२.८.९५ हा मानीव दिनांक मंजूर करण्यात आला आहे.) |
| २२१ | श्री.एम.डी.धांडे | १२.११.६० | २२.८.९५ | पदोन्नती | कायम | इ.मा.व. | --- |
| २२२ | श्री.पी.बी.गावडे | १६.७.६१ | २२.८.९५ | पदोन्नती | कायम | भ.ज.क | --- |
| २२३ | श्री.एस.आर.वाडेकर | ३०.११.५६ | २२.८.९५ | पदोन्नती | कायम | इ.मा.व. | --- |
| २२४ | श्री.एस.डी.कपाळे | ५.५.५९ | २२.८.९५ | पदोन्नती | कायम | खुला | --- |
| २२५ | श्री.ए.डी.पुसावळे | २९.५.६० | २२.८.९५ | पदोन्नती | कायम | इ.मा.व. | --- |
| २२६ | श्री.जे.सी.पाडवी | १.६.५९ | २२.८.९५ | पदोन्नती | कायम | अ.ज. | --- |
| २२७ | श्री.डी.जी.गव्हाळे | १.४.५२ | २२.८.९५ | पदोन्नती | कायम | अ.जा. | --- |
| २२८ | श्री.पी.एल.चिंचघरे | २४.१०.४७ | २२.८.९५ | पदोन्नती | कायम | अ.ज. | सेवानिवृत्त होणार-२००५ |
| २२९ | श्री.ए.डी.लोखंडे | २.२.५० | २२.८.९५ | पदोन्नती | कायम | अ.जा. | --- |
| २३० | श्री.बी.आर.वाकचौरे | ४.१.५० | २२.८.९५ | पदोन्नती | कायम | अ.जा. | --- |
| २३१ | श्री.पी.टी.केंद्रे | १.४.५९ | २२.८.९५ | पदोन्नती | कायम | भ.ज.ड | --- |
| २३२ | श्री.ए.आर.पाटोळे | १८.२.५५ | २०.१२.९७ | पदोन्नती | कायम | वि.जा.भ.ज. | --- |
| २३३ | श्रीमती निर्मला नितनवार | ७.१.४७ | २०.१२.९७ | पदोन्नती | कायम | अ.जा. | सेवानिवृत्त होणार-२००५ |
| २३४ | श्री.आर.एस.मेश्राम | १५.३.४९ | २०.१२.९७ | पदोन्नती | कायम | अ.जा. | --- |

| अ.क्र. | अधिका-याचे नांव | जन्मतारीख | मविसे वर्ग-१ पदावरील सततची सेवा | सरळसेवा/ पदोन्नती | मविसे मध्ये कायम/ स्थानापन्न | प्रवर्ग | शेरा |
|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ |
| २३५ | श्री.एम.पी.शिंदे | १.६.४७ | २०.१२.९७ | पदोन्नती | कायम | खुला | सेवानिवृत्त होणार-२००५ |
| २३६ | श्री.एन.ए.शेख कुरेशी | ३.५.६२ | २०.१२.९७ | पदोन्नती | कायम | इ.मा.व. | --- |
| २३७ | श्री.आर.के.जोशी | १.६.५९ | २०.१२.९७ | पदोन्नती | कायम | खुला | --- |
| २३८ | डॉ.डी.ए.देशमुख | १९.१०.६० | २०.१२.९७ | पदोन्नती | कायम | खुला | --- |
| २३९ | श्री.ए.एम.देशमुख | १५.४.६१ | २०.१२.९७ | पदोन्नती | कायम | खुला | --- |
| २४० | श्री.जे.एस.भोर | ६.१०.६३ | २०.१२.९७ | पदोन्नती | कायम | खुला | --- |
| २४१ | श्री.एस.बी.माने | २.१०.६० | २०.१२.९७ | पदोन्नती | कायम | खुला | --- |
| २४२ | श्री.एस.बी.भातलवंडे | १९.८.६१ | २०.१२.९७ | पदोन्नती | कायम | खुला | --- |
| २४३ | श्री.आर.पी.कुलकर्णी | ५.३.६३ | २०.१२.९७ | पदोन्नती | कायम | खुला | --- |
| २४४ | श्री.ए.एम.महाजन | १.६.५७ | २०.१२.९७ | पदोन्नती | कायम | इ.मा.व. | --- |
| २४५ | श्री.एस.डी.मुंडे | १.३.६५ | २०.१२.९७ | पदोन्नती | कायम | भ.ज.-ड | --- |
| २४६ | श्री.पी.आर.सवडे | २७.९.६४ | २०.१२.९७ | पदोन्नती | कायम | खुला | --- |
| २४७ | श्री.के.एस.दुमाने | १०.१२.४७ | २०.१२.९७ | पदोन्नती | कायम | भ.ज.ब. | सेवानिवृत्त होणार-२००५ |
| २४८ | श्री.एस.डी.पगारे | २२.२.४९ | २१.१.९९ | पदोन्नती | कायम | अ.जा. | --- |
| २४९ | श्री.एस.के.चिल्लाळ | १०.८.६१ | २१.१.९९ | पदोन्नती | कायम | वि.मा.प्र. | --- |
| २५० | श्रीमती एन.एस.अप्रे | २०..१०.५६ | २१.१.९९ | पदोन्नती | कायम | अ.ज. | --- |
| २५१ | श्री.एम.आर.पाटील | १५.७.५२ | २१.१.९९ | पदोन्नती | कायम | अ.ज. | --- |
| २५२ | श्री.बी.एल.काटकर | १४.४.४७ | २१.१.९९ | पदोन्नती | कायम | अ.जा. | सेवानिवृत्त होणार-२००५ |
| २५३ | श्री.जी.एस.जालगांवकर | १५.३.४७ | २१.१.९९ | पदोन्नती | कायम | अ.जा. | सेवानिवृत्त होणार-२००५ |
| २५४ | श्रीमती आय.जी.पवार | २.४.४८ | २१.१.९९ | पदोन्नती | कायम | अ.जा. | --- |
| २५५ | श्री.जी.बी.चाळके | १८.११.४७ | २१.१.९९ | पदोन्नती | कायम | खुला | सेवानिवृत्त होणार-२००५ |
| २५६ | श्री.आर.जी.कोल्हेवाड | २७.६.५५ | २१.१.९९ | पदोन्नती | ------- | अ.ज. | वि.प.विहीत वेळेत व संधीत पास न झाल्याने ज्येष्ठता गमावली आहे. |
| २५७ | श्री.जी.एस.देशपांडे | २०.१.४७ | २१.१.९९ | पदोन्नती | कायम | खुला | सेवानिवृत्त होणार-२००५ |

| अ.क्र. | अधिका-याचे नांव | जन्मतारीख | मविसे वर्ग-१ पदावरील सततची सेवा | सरळसेवा/ पदोन्नती | मविसे मध्ये कायम/ स्थानापन्न | प्रवर्ग | शेरा |
|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ |
| २५८ | श्री.एस.व्ही.गिरी | १२.१२.५८ | ३.५.२००० | पदोन्नती | कायम | भ.ज.ब. | --- |
| २५९ | श्री.आर.एस.नंदेश्वर | ३.४.४७ | ३०.५.२००० | पदोन्नती | कायम | अ.जा. | सेवानिवृत्त होणार-२००५ |
| २६० | श्री.एस.जी.बनकर | १.७.४८ | ३०.५.२००० | पदोन्नती | कायम | इमाव | --- |
| २६१ | श्री.एस.पी.रामटेके | २१.२.५० | ३०.५.२००० | पदोन्नती | कायम | अ.जा. | --- |
| २६२ | कु.सरला आमलेकर | १६.६.४७ | ३०.५.२००० | पदोन्नती | कायम | खुला | सेवानिवृत्त होणार-२००५ |
| २६३ | श्री.एम.आर.जाधव | १.६.५६ | ३०.५.२००० | पदोन्नती | कायम | विजा/भज | --- |
| २६४ | श्री.बी.एम.महामुनी | ११.११.४८ | ३०.५.२००० | पदोन्नती | कायम | इमाव | --- |
| २६५ | श्री.व्ही.बी.बल्लुरकर | २२.८.५१ | ३०.५.२००० | पदोन्नती | कायम | अ.ज. | --- |
| २६६ | श्री.पी.एम.सुर्यवंशी | २०.६.५६ | ३०.५.२००० | पदोन्नती | ----- | अ.ज. | वि.प.विहीत वेळेत व संधीत पास न झाल्याने ज्येष्ठता गमावली आहे. |
| २६७ | श्री.पी.एस.गायकवाड | २८.३.४७ | ३०.५.२००० | पदोन्नती | कायम | खुला | सेवानिवृत्त होणार-२००५ |
| २६८ | श्री.एम.जी.पवार | १५.४.४८ | ३०.५.२००० | पदोन्नती | कायम | खुला | --- |
| २६९ | श्री.सी.आर.अग्रवाल | २.१.४७ | ३०.५.२००० | पदोन्नती | कायम | खुला | सेवानिवृत्त होणार-२००५ |
| २७० | श्री.डी.बी.कपूर | १.६.४७ | ३०.५.२००० | पदोन्नती | कायम | खुला | सेवानिवृत्त होणार-२००५ |
| २७१ | श्री.पी.एन.खाडे | १०.११.४७ | ३०.५.२००० | पदोन्नती | कायम | अ.जा. | सेवानिवृत्त होणार-२००५ |
| २७२ | श्री.जी.पी.लकारे | २०.६.५३ | ३०.५.२००० | पदोन्नती | कायम | भज-ब | --- |
| २७३ | श्री.व्ही.एस.वाघमारे | ४.५.५० | ९.११.२००० | पदोन्नती | कायम | अ.जा. | --- |
| २७४ | श्री.संदीपकुमार र. साळुंके | | २४.५.२००४ | स.से.भ. | कायम | | राजीनामा दिला दि.२२.९.०४ |
| २७५ | श्री.मनोजकुमार ता. चौधर | ३.४.७१ | २४.५.२००४ | स.से.भ. | कायम | भज-ड | |
| २७६ | श्री.वासुदेव पांडुरंग सोळंके | ६.७.७६ | २४.५.२००४ | स.से.भ. | कायम | विजा-अ | |
| २७७ | श्री.राजेश विष्णु इंगळे | ३.४.७५ | २४.५.२००४ | स.से.भ. | कायम | विमाप्र | |
| २७८ | श्री.तुषार तुकाराम माळी | ६.७.७६ | २४.५.२००४ | स.से.भ. | कायम | इमाव | |
| २७९ | श्री.राजेंद्र माधवराव भुयार | १.६.७८ | २४.५.२००४ | स.से.भ. | कायम | इमाव | |
| २८० | श्री.स. अ न. बागवाण | | २४.५.२००४ | स.से.भ. | कायम | इमाव | कार्यमुक्त केले |

| अ.क्र. | अधिका-याचे नांव | जन्मतारीख | मविसे वर्ग-१ पदावरील सततची सेवा | सरळसेवा/ पदोन्नती | मविसे मध्ये कायम/ स्थानापन्न | प्रवर्ग | शेरा |
|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ |
| २८१ | श्री.विवेक शेषराव बोदरे | १९.९.७१ | २४.५.२००४ | स.से.भ. | कायम | इमाव | |
| २८२ | श्री.शेखर तात्याजी रौदंळ | १.६.७७ | २४.५.२००४ | स.से.भ. | कायम | इमाव | |
| २८३ | श्री.प्रदीप मधुकर चौधरी | २६.१२.७८ | २४.५.२००४ | स.से.भ. | कायम | इमाव | |
| २८४ | श्री.विश्वास शिवराम सिध्द | ८.११.७४ | २४.५.२००४ | स.से.भ. | कायम | भज-क | |
| २८५ | श्री.योगेश रमेशराव जवादे | २५.४.७८ | २४.५.२००४ | स.से.भ. | कायम | भज-ब | |
| २८६ | श्रीमती रश्मी श. खांडेकर | १९.१२.७८ | २४.५.२००४ | स.से.भ. | कायम | भज-क | |
| २८७ | श्रीमती प्रिती ब. देशमुख | ५.१.७६ | २४.५.२००४ | स.से.भ. | कायम | इमाव | |
| २८८ | श्रीमती वर्षा स. पवार | १७.१.७६ | २४.५.२००४ | स.से.भ. | कायम | इमाव | |
| २८९ | श्रीमती सिता ल.कबनुरे/ पुड | २५.६.७६ | २४.५.२००४ | स.से.भ. | कायम | विमाप्र | |
| २९० | श्रीमती रिता नरेंद्र उदासी | | २४.५.२००४ | स.से.भ. | कायम | | सेवा मुक्त केले |
| २९१ | डॉ. ज्ञानोबा तुबाकले | १.४.७५ | २४.५.२००४ | स.से.भ. | कायम | अ.ज. | |
| २९२ | श्री.अजिक्य रामचंद्र पवार | ४.५.७५ | २४.५.२००४ | स.से.भ. | कायम | अ.ज. | परिविक्षाधीन कालावधी समाप्त झालेला नाही. |
| २९३ | श्रीमती माधवी सा. सुर्यवंशी | | २४.५.२००४ | स.से.भ. | कायम | | कार्यमुक्त केले. |
| २९४ | श्री.आर.बी.बुरुड | १.१२.५९ | ९.११.२००० | पदोन्नती | कायम | अ.जा. | --- |
| २९५ | श्री.आर.बी.मरस्कोल्हे | ३०.८.४९ | ९.११.२००० | पदोन्नती | कायम | अ.ज. | --- |
| २९६ | श्री.सी.पी.शेंडे | २८.८.४८ | ९.११.२००० | पदोन्नती | कायम | अ.जा. | |
| २९७ | श्रीमती एस.के.कांबळे | १८.४.५० | ९.११.२००० | पदोन्नती | कायम | अ.जा. | --- |
| २९८ | श्री.डी.एस.देशमुख | २.३.४७ | ९.११.२००० | पदोन्नती | कायम | खुला | सेवानिवृत्त होणार-२००५ |
| २९९ | श्रीमती मनोरमा रामटेके | ४.३.४९ | ९.११.२००० | पदोन्नती | कायम | अ.जा. | --- |
| ३०० | श्री.व्ही.जे.वानखेडे | ४.२.५० | ९.११.२००० | पदोन्नती | कायम | अ.ज. | --- |
| ३०१ | श्री.बी.जे.मिणेकर | ६.७.६१ | ९.११.२००० | पदोन्नती | कायम | विजा-अ | --- |
| ३०२ | श्री.आर.पी.शिवदास | १.१०.६४ | ९.११.२००० | पदोन्नती | कायम | अ.जा. | --- |
| ३०३ | श्री.एस.बी.आजवेलकर | १६.१२.५९ | ९.११.२००० | पदोन्नती | कायम | अ.जा. | --- |
| ३०४ | श्री.चं.वा.खंदारे | १८.३.६३ | ९.११.२००० | पदोन्नती | कायम | अ.जा. | --- |

| अ.क्र. | अधिका-याचे नांव | जन्मतारीख | मविसे वर्ग-१ पदावरील सततची सेवा | सरळसेवा/ पदोन्नती | मविसे मध्ये कायम/ स्थानापन्न | प्रवर्ग | शेरा |
|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ |
| ३०५ | श्री.एम.एस.घुले | १४.७.६६ | ९.११.२००० | पदोन्नती | कायम | भज-क | --- |
| ३०६ | श्री.व्ही.के.खिल्लारे | ९.६.६५ | ९.११.२००० | पदोन्नती | कायम | अ.जा. | --- |
| ३०७ | डॉ.एम.पी. पोहरे | ८.२.६४ | ९.११.२००० | पदोन्नती | कायम | अ.जा. | --- |
| ३०८ | श्री.आर.एच.कोकरे | १३.११.६२ | ९.११.२००० | पदोन्नती | कायम | भज-क | --- |
| ३०९ | श्री.बी.ए.बोटे | १०.९.६६ | ९.११.२००० | पदोन्नती | कायम | अ.ज. | --- |
| ३१० | श्री.एस.डी.वळवी | १.६.५७ | ९.११.२००० | पदोन्नती | कायम | अ.ज. | --- |
| ३११ | श्री.पी.एल.जाधव | १५.५.६५ | ९.११.२००० | पदोन्नती | कायम | विजा-अ | --- |
| ३१२ | श्री.वाय.जी.पवार | १.६.४९ | ९.११.२००० | पदोन्नती | कायम | अ.जा. | --- |
| ३१३ | श्री.बी.एम.नरोटे | १.६.५७ | ९.११.२००० | पदोन्नती | कायम | अ.ज. | --- |
| ३१४ | श्री.एस.एन.तायडे | १.६.५२ | ९.११.२००० | पदोन्नती | कायम | अ.जा. | --- |
| ३१५ | श्री.ए.डी.ठाकरे | ३.६.५४ | ९.११.२००० | पदोन्नती | कायम | इमाव | --- |
| ३१६ | श्री.एस.व्ही.देशमुख | ९.४.४७ | ९.११.२००० | पदोन्नती | कायम | इमाव | सेवानिवृत्त होणार-२००५ |
| ३१७ | श्रीमती एल.एम.बोबडे | ७.१.५४ | ९.११.२००० | पदोन्नती | कायम | अ.जा. | -- |
| ३१८ | श्री.व्ही.आर.नाईक | १.६.५१ | ९.११.२००० | पदोन्नती | कायम | विजा-अ | -- |
| ३१९ | श्रीमती निर्मला धोपे | २१.१.४९ | ९.११.२००० | पदोन्नती | स्थानापन्न | विमाप्र | अभावित (Fortuitous) पदोन्नती |
| ३२० | श्री.जी.ए.पाटील | २.१२.५७ | ९.११.२००० | पदोन्नती | स्थानापन्न | खुला | कित्ता<br>वि.प.विहीत वेळेत व संधीत पास न झाल्याने ज्येष्ठता गमावली आहे. |
| ३२१ | श्री.सी.ए.मोकाशी | ९.१२.५० | ९.११.२००० | पदोन्नती | स्थानापन्न | भज-ब | अभावित (Fortuitous) पदोन्नती |
| ३२२ | श्री.आर.डी.बि-हाडे | १०.५.५० | ९.११.२००० | पदोन्नती | स्थानापन्न | अ.जा. | कित्ता |
| ३२३ | श्री.जी.टी.मेंढे | २०.१०.४९ | ९.११.२००० | पदोन्नती | स्थानापन्न | अ.जा. | कित्ता |
| ३२४ | श्री.पी.पी.गोगुलवार | ४.६.५३ | ९.११.२००० | पदोन्नती | स्थानापन्न | खुला | कित्ता |
| ३२५ | श्री.एन.बी.यादव | २५.६.५५ | ९.११.२००० | पदोन्नती | स्थानापन्न | विजा/भज | कित्ता<br>वि.प.विहीत वेळेत व संधीत पास न झाल्याने ज्येष्ठता गमावली |

